**विविध कृषि पुरस्कार विजेते व पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांचा सत्कार करण्याची योजना सन २००९-१० मध्ये चालू ठेवण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.कृपुस-२००९/प्र.क्र.१७०/११-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २४ जून,२००९**

वाचा :

१) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र.कृसंप्र-२१९१/सीआर १०४/११-अे, दि.३० सप्टेंबर, १९९१

२) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र.कृसंप्र-१२०७/प्र.क्र.१ (भाग-२)/११-अे, दि.२३ जून, २००८

३) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र.कृपुसं-२००८/प्र.क्र.३२१/११-अे, दि.९ सप्टेंबर,२००८

**शासन निर्णय :**

राज्यात कृषि व कृषि संलग्न क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या व्यक्ति/ संस्था यांना दरवर्षी डॉ.पंजाबराव देशमुख कृषिरत्न, वसंतराव नाईक कृषिभूषण, जिजामाता कृषिभूषण, वसंतराव नाईक शेतीमित्र व वसंतराव नाईक शेतीनिष्ठ इ.विविध कृषि पुरस्कार आणि फलोत्पादन क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या व्यक्तींना उद्यान पंडित पुरस्कार प्रदान करुन त्यांचा व पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांचा उचित सत्कार करुन सन्मानित करण्यात येते. उपरोक्त क्र.२ येथील दि.२३ जून,२००८ च्या शासन निर्णयान्वये डॉ.पंजाबराव देशमुख कृषिरत्न, वसंतराव नाईक कृषिभूषण, जिजामाता कृषिभूषण, वसंतराव नाईक शेतीमित्र व वसंतराव नाईक शेतीनिष्ठ पुरस्कारांचे स्वरुप तसेच उपरोक्त क्र.३ येथील दि.९ सप्टेंबर,२००८ च्या शासन निर्णयान्वये पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांना प्रदान करावयाच्या पुरस्कारांचे स्वरुप निश्चित करण्यात आलेले आहे.

२. सदर योजना सन २००९-१० मध्ये चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर पुरस्कार, रोख बक्षिसे व सत्कार समारंभासाठी अपेक्षित रुपये ३०.०० लक्ष (अक्षरी रुपये तीस लक्ष फक्त) इतक्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर प्रयोजनार्थ उपलब्ध करुन दिलेली रक्कम खालील लेखाशिर्षाखाली संक्षिप्त देयकावर एक रकमी काढण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) यापूर्वी संक्षिप्त देयकांवर काढलेल्या रकमेचे तपशीलवार देयक विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे या कार्यालयाने पत्र क्र.९०१७, दिनांक १२/१२/२००८ अन्वये कोषागार अधिकारी, ठाणे यांचेकडे सादर केलेले आहे. त्यामुळे तपशीलवार देयक सादर करणे प्रलंबित नाही.

२) शेतकरी सत्कार समारंभाचे देयक कोषागारास सादर करण्यासाठी कोणत्याही खर्चाचे उपप्रमाणके व सत्कारार्थी शेतकऱ्यांची यादी देयक सादर करण्याच्या अगोदर प्राप्त होत नाही. त्यामुळे कोषागारात खर्च नियमित देयकाद्वारे सादर करणे अशक्य आहे.

३) वित्त विभागाच्या मान्यतेनंतर संक्षिप्त देयक रक्कम काढण्यात आल्यानंतर त्याचे तपशीलवार देयक रक्कम काढल्यापासून एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

४) सदर संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे यांची राहील.

५) मासिक निधी विवरणपत्रानुसार उपरोक्त रक्कम या महिन्यामध्ये खर्च करण्यास उपलब्ध आहे.

४. सदर प्रयोजनार्थ कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे आणि विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५ यावर होणारा खर्च वित्त विभागाने प्राधिकृत केल्यानुसार मागणी क्र.डी-३, २४०१ पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण, (००) (१०९) विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) (०३) पीक स्पर्धा (२४०१ ०७५३) (योजनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० करिता मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६ सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३७०/०९/विनियम, दि. २३ जून,२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २००९०६२४१७२५११००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( ब. दि. उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
३) सहसचिव (फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) विभागीय कृषि सहसंचालक, कोकण विभाग, ठाणे
६) विभागीय कृषि सहसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
७) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / ठाणे
९) कक्ष अधिकारी , का.१४-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प)/(विनियम) , मंत्रालय, मुंबई-३२
११) मा.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) निवड नस्ती